MCT 0302-406 G.R

<u>आस्थापना</u>
मोटार अपघात दावा न्यायाधिकरण,
नागपूर अस्थायी पदांना मुदतवाढ.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक : एमसीटी-०२०४/२२१/सीआर-३३/परि-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : २ एप्रिल, २००४

<u>वाचा :-</u> १) शासन निर्णय गृह विभाग, क्रमांक एमसीटी-०१/२०००/९३/सीआर-१६/परि-५, दि. ५.११.२००१

२) शासन निर्णय,गृह विभाग क्रमांक : एमसीटी-०२०३/२९९/सीआर-३६/परि-५, दि.७.४.२००३

३) शासन निर्णय क्रमांक : एमसीटी-०३०२/४०६/सीआर-३१/परि-५, दि. २३.७.२००३

४) शा.नि., गृह विभाग क्र.एमसीटी ०२०४/२२१/सीआर-३६, दि.७.१.२००४

५) जिल्हा व सत्र न्यायाधीश, नागपूर यांचे पत्र क्र. ३४७/२००४, दि. २३.१.२००४

६) जिल्हा व सत्र न्यायाधिश यांचे पत्र क्र. बी ४(१०)/३४७/२००४, दि. २३.१.२००४

<u>शासन निर्णय :-</u> शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक :एमसीटी-०१/२०००/९३/सीआर-१६/परि-५, दिनांक ५.११.२००१ अन्वये नागपूर जिल्ह्यात २ स्वतंत्र मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे स्थापन करण्यासाठी खालील तक्त्यात दर्शविलेली एकूण २४ अस्थायी पदे दिनांक २८.२.२००२ पर्यंत निर्माण करण्यात आली होती. सदरहू २४ पदांपैकी २२ अस्थायी पदांना दिनांक ३१.८.२००३ पर्यंत शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक : एमसीटी-०२०३/२९९/सीआर-३६/ परि-५, दि.७.४.२००३ अन्वये मुदतवाढ देण्यात आली होती. सदर पदे ६ महिन्यापेक्षा अधिक काळ रिक्त नाहीत. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एमसीटी ०३०२/४०६/सीआर-३१/परि-५, दि.२३.७.२००३ अन्वये ९ पदे पुनरुज्जीवीत करण्यास कार्योत्तर मंजूरी देण्यात आली. यामध्ये प्रबंधकाच्या २ रिक्त पदांचा समावेश आहे. सदर पदे भरण्याची कार्यवाही चालू आहे. सदर पदांना दिनांक ७.१.२००४ अन्वये दिनांक १.१.२००४ ते २९.२.२००४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता या शासन निर्णयान्वये खाली दर्शविलेल्या २४ पदांना दि.१.३.२००४ ते ३१.८.२००४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | अस्तित्वात असलेली पदे |
|---|---|---|
| १ | सदस्य | २ |
| २ | प्रबंधक वर्ग-२ | २ |
| ३ | उच्च श्रेणी लघुलेखक | २ |
| ४ | वरिष्ठ श्रेणी लिपिक | २ |
| ५ | कनिष्ठ श्रेणी लिपिक | ६ |
| ६ | बेलिफ | ४ |
| ७ | हवालदार | २ |
| ८ | शिपाई | ४ |
| | एकूण | २४ |

२. याबाबत होणारा खर्च "२०४१-वाहनांवरील कर, ८००-इतर खर्च (००)(०१) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, " या शिर्षाखालील २००४-२००५ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-२१७/२००४/व्यय-८, दि. २३.३.२००४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

आ का ठमाके

( आ. का. ठमाके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल साईड), मुंबई (पत्राने)
जिल्हा व सत्र न्यायाधिश, नागपूर
सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, नागपूर
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
वित्त विभाग ( व्यय ८/अर्थसंकल्प- १७/वित्तीय सुधारणा-१) मंत्रालय, मुंबई.
गृह विभाग, अर्थसंकल्प बीमुकी- १, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती परिवहन -५